**अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, औरंगाबाद यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांतर्गत कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांसाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२१/प्र.क्र.३३/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २६ जून, २०२३.

**संदर्भ :-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२०.
३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दि.२६ एप्रिल, २०२१.
४) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्र.ईएसटी-२०२१/प्र.क्र.३८/प्रशा.-१, दि.०१ जून, २०२१.
५) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्र.ईएसटी-२०२१/प्र.क्र.९८/प्रशा.-१, दि.२४ जानेवारी, २०२२.
६) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१९/प्र.क्र.५८१ ए/१६-ब, दि.१४ डिसेंबर, २०२२.
७) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे क्र.मुअऔ/ का-५/अराज/२०२३/१७५६, दि.१६ मे, २०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, औरंगाबाद यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असलेले श्री.मधुकर सदाशिव सुरवसे, कनिष्ठ अभियंता, श्रीम.विद्या शिवाजी तोरडमल, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक, श्री.गणेश बबनराव बिऱ्हारे, वरिष्ठ लिपिक, श्री.सुनिल यशवंत जाधव, वरिष्ठ लिपिक, श्री.शाम दुर्गान्ना धर्मपेल्ली, शिपाई व श्री.रशीद खान युसुफ खान, शिपाई यांचे अनुसुचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्यामुळे त्यांच्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णय, दि.२६ एप्रिल, २०२१, दि.०१ जून, २०२१ व दि.२४ जानेवारी, २०२२ अन्वये अधिसंख्य पद निर्माण करुन त्यांना ११ महिने किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त होतील त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशींवर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. उपरोक्त अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदाची मुदत संपुष्टात आल्यामुळे सदर अधिसंख्य पदास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, औरंगाबाद यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असलेल्या खालील अधिकारी / कर्मचारी यांना पुढीलप्रमाणे मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) श्री.मधुकर सदाशिव सुरवसे, कनिष्ठ अभियंता यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२८ ऑक्टोबर, २०२१ मधील तरतुदीनुसार दि.०१ मे, २०२२ पासून दि.३१ मार्च, २०२३ पर्यंत ११ महिने व तद्नंतर सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४ डिसेंबर, २०२२ मधील

तरतुदीनुसार ०१ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन दि.०२ एप्रिल, २०२३ पासून दि.०१ मार्च, २०२४ पर्यंत पुढील ११ महिने मुदतवाढ देण्यात येत आहे.

२) श्रीम.विद्या शिवाजी तोरडमल, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक, श्री.गणेश बबनराव बिऱ्हारे, वरिष्ठ लिपिक, श्री.शाम दुर्गान्ना धर्मपल्ली, शिपाई व श्री.रशीद खान युसुफ खान, शिपाई यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२८ ऑक्टोबर, २०२१ मधील तरतुदीनुसार दि.२६ मार्च, २०२२ पासून दि.२५ फेब्रुवारी, २०२३ पर्यंत ११ महिने व तद्नंतर सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४ डिसेंबर, २०२२ मधील तरतुदीनुसार ०१ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन दि.२७ फेब्रुवारी, २०२३ पासून दि.२६ जानेवारी, २०२४ पर्यंत पुढील ११ महिने मुदतवाढ देण्यात येत आहे.

३) श्री.सुनिल यशवंत जाधव यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४ डिसेंबर, २०२२ मधील तरतुदीनुसार ०१ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन दि.२५ डिसेंबर, २०२२ पासून दि.२४ नोव्हेंबर, २०२३ पर्यंत पुढील ११ महिने मुदतवाढ देण्यात येत आहे.

**२.** उपरोक्त अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतनावरील खर्च ते ज्या कार्यालयात कार्यरत राहतील, त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधीत वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच सदर अधिकारी/कर्मचारी यांच्या अधिसंख्य पदावरील मुदतवाढीचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर विहित मुदतीत प्रस्ताव शासनास सादर करण्याची दक्षता अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, औरंगाबाद यांनी घ्यावी.

**३.** सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२८ ऑक्टोबर, २०२१ व दि.१४ डिसेंबर, २०२२ या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०६२६१६०३२०४७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO

Digitally signed by SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=1fbca76d11ad25e383a0e28da215f01e12183c1b565ddd29aaf1ffbfad8e9e9c, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6F385E4139AB144CAAF92B440B55068479C3789EA50EC85EB7A16B7C932CB397, cn=SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO
Date: 2023.06.26 16:05:38 +05'30'

**( विक्रमसिंह प्र. शिंदे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-** १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद.
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, औरंगाबाद.
३) अपर मुख्य सचिव (सा.बां.) /सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
४) महालेखापाल (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, जालना व बीड
६) प्रधान महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) कार्यासन सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवडनस्ती.